राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत सन २०१४-१५ या आर्थिक वर्षासाठी राज्य हिश्श्याचे अनुदान वितरीत करण्याबाबत.......... (२२१५ २०७१)

# महाराष्ट्र शासन

## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

**शासन निर्णय क्रमांकः** राग्रापे-२०१४/प्र.क्र.४३/पा.पु.१०
जी.टी.हॉस्पीटल इमारत, ७ वा मजला,
लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई ४०० ००१
तारीख: २४ फेब्रुवारी, २०१५

**शासन निर्णय -**

राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम या केंद्र पुरस्कृत कार्यक्रमांतर्गत राज्य हिश्श्यापोटी आर्थिक वर्ष २०१४-१५ मध्ये मागणी क्र. वाय- ०२, लेखाशिर्ष २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता, ०१, पाणी पुरवठा, १०२, ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम, (०२) जिल्हा परिषदांना योजनांतर्गत अनुदाने, (०२)(१५) नळाद्वारे पाणी पुरवठा योजना भारत निर्माण कार्यक्रम (राज्यक्षेत्र), ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) (२२१५ २०७१) या लेखाशिर्षाखाली निधी वितरणाचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

यासंदर्भात उपरोक्त लेखाशिर्षांतर्गत ग्रामीण भागातील नळ पाणी पुरवठा योजना राबविण्यासाठी रु. २९.३३ कोटी (रुपये एकोणतीस कोटी तेहत्तीस लाख मात्र) इतके अनुदान या शासन निर्णयासोबत जोडलेल्या विवरणपत्रातील स्तंभ क्र. ३ अनुसार महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई व संबंधित जिल्हा परिषदांना त्यांचे मुख्य कार्यकारी अधिकारी यांचेमार्फत अर्थसंकल्प प्रणालीद्वारे (BEAMS) पुढील अटींवर मंजूर व मुक्त करण्यात येत आहे.

**अटी :-**

१) संबंधित जिल्हा परिषदांनी / महाराष्ट्र जीवन प्राधिकरण मुंबई यांनी हे अनुदान राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत निश्चित वार्षिक कृती आराखडयात उपरोक्त घटकांसाठी समाविष्ट असलेल्या कव्हरेज व गुणवत्ताबाधीत गावे/वाडयांमधील प्राथम्यक्रमानुसार येणाऱ्या गावे/वाडयांमधील योजनांची कामे तसेच ज्या केंद्रीय सहाय्यित योजनांमध्ये शासन सहभाग सक्तीचा करण्यात आलेला आहे, अशा प्रगतीपथावरील योजनांची कामे पूर्ण करण्यासाठी प्राथम्याने खर्च करावयाचे आहे.

२) संबंधित जिल्हा परिषदांनी/ महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांनी या अनुदानातून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे ठेवावेत. या शासन निर्णयातील अटी व शर्तींची व NRDWP या योजनेंतर्गत केंद्र शासनाने घालून दिलेल्या मार्गदर्शक सूचनांची संबंधित जिल्हा परिषदांकडून/ महाराष्ट्र जीवन प्राधिकरणा कडून पूर्तता होत आहे, याची शासनाला खात्री करुन घेता यावी, यासाठी महालेखापाल, महाराष्ट्र- १ /२, मुंबई/नागपूर यांना तसेच या विभागातील प्राधिकृत केलेल्या अधिकाऱ्यांना लेखा परिक्षणाकरीता संबंधित जिल्हा परिषदांची/ महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांची पुस्तके व लेखे पाहण्याचा अधिकार राहील. तसेच महालेखापाल यांना त्यांचे काम योग्य रितीने पार पाडता यावे म्हणून संबंधित जिल्हा परिषदा/ महाराष्ट्र जीवन प्राधिकरण संपूर्ण मदत व सुविधा पुरवतील.

३) शासन परिपत्रक ग्रामविकास विभाग क्र. आरसीएन-१८९/सी.आर.-३०२७/२८, दि. ५/९/९० मधील सूचनेप्रमाणे सदर अनुदानाच्या खर्चाचा महालेखापाल कार्यालयात नोंदविलेल्या खर्चाशी ताळमेळ घालावा व ताळमेळाचे अहवाल विहित दिनांकांना संबंधित जिल्हा परिषदांनी/ महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने कार्यासन पापु-१० /पापु-२०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांना सादर करावे. त्याचप्रमाणे उपयोगिता प्रमाणपत्र महालेखापाल कार्यालय, मुंबई / नागपूर व पापु-१० कार्यासनास सादर करावे.

४) राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार कव्हरेज व गुणवत्ताबाधीत याखाली हाती घेतलेल्या योजनांसाठीचा खर्च हा ५०% केंद्र निधीतून व ५०% राज्य निधीतून करणे आवश्यक आहे.

५) केंद्र व राज्य हिश्श्यातून केलेल्या खर्चाची नोंद न चुकता, IMIS या प्रणालीवर घेण्यात येऊन सदर नोंदी वेळोवेळी अद्ययावत करण्यात याव्यात.

६) सदर निधी सन २०११-१२, २०१२-१३, २०१३-१४, व २०१४-१५ या वर्षांच्या कृती आराखडयात समाविष्ट असलेल्या गावांच्या योजनांसाठीच खर्च करावा. तसेच उपलब्ध करुन देण्यात आलेला निधी उपयोगात आणण्यासाठी कालबध्द कार्यक्रम आखून खर्चाचे नियोजन करावे व उपयोगिता प्रमाणपत्रे शासनास वेळीच सादर करावीत.

या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई यांना मुक्त करण्यात आलेला निधी रु. २०.०० कोटी (रु. वीस कोटी फक्त) बाबत महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाचे संचालक, (वित्त) यांच्या स्वाक्षरीने तयार केलेले व उपसचिव (पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग) (श्री. कुदळे) यांनी प्रतिस्वाक्षरीत केलेले देयक

अधिदान व लेखा अधिकारी कार्यालय, मुंबई यांना सादर करण्यात यावे. सदरहू रक्कम एनईएफटी (NEFT) प्रणालीद्वारे महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांच्या खाती जमा करण्यात यावी.

यावर होणारा खर्च मागणी क्र. वाय- ०२, लेखाशिर्ष २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता, ०१, पाणी पुरवठा, १०२, ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम, (०२) जिल्हा परिषदांना योजनांतर्गत अनुदाने, (०२)(१५) नळाद्वारे पाणी पुरवठा योजना भारत निर्माण कार्यक्रम (राज्यक्षेत्र), ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) (२२१५ २०७१) या लेखाशिर्षाखाली खर्ची घालावा व तो सन २०१४-१५ साठी मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

**" हा शासन निर्णय नियोजन विभाग व वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र. अनुक्रमे २१/१४४३, दि. २८/१/२०१५ व क्र. ४९/व्यय-३, दि. १०/२/२०१५ अनुसार त्या विभागांनी दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे."**

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०२२५१६००५१९७२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Gokhale Vidyadhar Y

Digitally signed by Gokhale Vidyadhar Y
DN: CN = Gokhale Vidyadhar Y, C = IN, S = Maharashtra, O = Govt of Maharashtra, OU = Water Supply and Sanitation Department
Date: 2015.02.26 12:27:30 +05'30'

**(वि.य.गोखले)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

महालेखापाल, महाराष्ट्र- १ मुंबई (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता)
महालेखापाल, महाराष्ट्र -२ नागपूर (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता)
अधिदान व लेखा अधिकरी, मुंबई
नियोजन (कार्यासन १४४३)/ वित्त विभाग (व्यय ३)मंत्रालय मुंबई
उपसचिव (अर्थसंकल्प) / उपसचिव ( पापु १० ) पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, नवी मुंबई, बेलापूर
सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई
संचालक ( वित्त ) महाराष्ट्र जीवन प्राधिकरण,सिडको भवन , बेलापूर नवी मुंबई

मुख्य कार्यकारी अधिकारी ,संबंधित जिल्हा परिषदा,
मुख्य वित्त व लेखाधिकारी , संबंधित जिल्हा परिषदा,
कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा, ,संबंधित जिल्हा परिषदा,
संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी,
पाणी पुरवठा व स्वच्छता विभागातील कार्यासने क्र. पा.पु.०४, पा.पु.२०.
निवडनस्ती पापु १०-कार्यासन

**विवरणपत्र**

| शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्र. राग्रापे-२०१४/प्र.क्र.४३/पा.पु.१०, दिनांक : २४ फेब्रुवारी, २०१५ चे सहपत्र | | |
|---|---|---|
| ग्रामीण नळ पाणी पुरवठा योजनांसाठी निधी वितरण (राज्य हिस्सा) **(लेखाशिर्ष २२१५ २०७१)** | | |
| अ.क्र. | संबंधित अंमल बजावणी यंत्रणा | वितरीत करण्यात येणारी रक्कम (रु. लाखात) |
| १ | जिल्हा परिषद, ठाणे | १००.०० |
| २ | जिल्हा परिषद, पुणे | २००.०० |
| ३ | जिल्हा परिषद, सांगली | २००.०० |
| ४ | जिल्हा परिषद, कोल्हापूर | २००.०० |
| ५ | जिल्हा परिषद, सोलापूर | १००.०० |
| ६ | जिल्हा परिषद ,जळगांव | १३३.०० |
| ७ | महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई | २०००.०० |
| | एकूण | २९३३.०० (रूपये दोन हजार नऊशे तेहत्तीस लाख मात्र) |
| | | |

Gokhale Vidyadhar Y

Digitally signed by Gokhale Vidyadhar Y
DN: CN = Gokhale Vidyadhar Y, C = IN, S = Maharashtra, O = Govt of Maharashtra, OU = Water Supply and Sanitation Department
Date: 2015.02.26 12:28:22 +05'30'

**(वि.य.गोखले)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन